कुंडल विकास, प्रशासन व व्यवस्थापन प्रबोधिनी (वने) यांचे अखत्यारीतील (योजनेत्तर) योजनेतील १५ अस्थायी पदांना सन २०२२-२३ मध्ये पुढे चालू ठेवण्यास मुदतवाढ देणे बाबत.

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक : संकीर्ण-२०२२/प्र.क्र.५०/फ-९**
**मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,**
**मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,**
**दिनांक :- १६ मार्च, २०२२**

वाचा :-

१. महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्र. एमएफएस-२०१७/प्र.क्र.७७/फ-८, दि.१३.०९.२०१९
२. महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्र. एमएफएस-२०१७/प्र.क्र.७७/फ-८, दि.२१.०९.२०२१
३. महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्र. संकीर्ण-२०२१/प्र.क्र.५५/फ-९, दि.२४.०३.२०२१
४. महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्र. संकीर्ण-२०२१/प्र.क्र.५५/फ-९, दि.०९.०९.२०२१
५. वित्त विभाग, शासन निर्णय क्र.पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दिनांक २२.०२.२०२२
६. उप वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे पत्र क्रमांक कक्ष-३ /योजनेत्तर/प्र.क्र.५२३(२१-२२)/२५०, दिनांक ०९.०२.२०२२

**शासन निर्णय :-**

उप वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी संदर्भ क्र.६ अन्वये कुंडल विकास, प्रशासन व व्यवस्थापन प्रबोधिनी (वने) यांचे अखत्यारीतील (योजनेत्तर) योजनेतील **१५ अस्थायी पदांना** सन २०२२-२३ या आर्थिक वर्षामध्ये पुढे चालु ठेवण्यास मंजूरी प्रदान करण्याबाबत विनंती केलेली आहे.

यापूर्वी महसूल व वन विभागच्या संदर्भ क्र.३ व ४ च्या शासन निर्णयान्वये कुंडल विकास, प्रशासन व व्यवस्थापन प्रबोधिनी (वने) यांचे अखत्यारीतील (योजनेत्तर) योजनेतील १५ अस्थायी पदांना सन २०२१-२२ मध्ये दिनांक ०१.०३.२०२१ ते २८.०२.२०२२ पर्यंत चालू ठेवण्याबाबत मुदतवाढ देण्यात आली आहे. तसेच संदर्भ क्र.२ च्या सुधारीत आकृतीबंधाचे पुर्नगठन प्रमाणे वन विभागाच्या एकूण २६५७३ पदांमध्ये या योजनेतील १५ अस्थायी पदांचा समावेश आहे.

वित्त विभागाच्या संदर्भ क्र.५ दिनांक २२.०२.२०२२ च्या शासन निर्णयान्वये सर्व प्रशासकीय विभागांना त्यांच्या आकृतीबंधात समाविष्ट असलेल्या अस्थायी पदांना तसेच, यापुर्वी आढावा मंजूर केल्यानंतर निर्माण करण्यात आलेल्या परंतु, ज्यांचा समावेश आकृत्तीबंधात करण्यात आलेला नाही, अशा अस्तित्वात असलेल्या सर्व अस्थायी पदांना दिनांक ०१.०३.२०२२ ते ३१.०८.२०२२ पर्यंत पुढे चालू ठेवण्यास मुदतवाढ देण्याचे अधिकार प्रदान करण्यात आलेले आहेत.

त्यानुसार कुंडल विकास, प्रशासन व व्यवस्थापन प्रबोधिनी (वने) यांचे अखत्यारीतील (योजनेत्तर) योजनेतील १५ अस्थायी पदांना दि.०१.०३.२०२२ ते दि.३१.०८.२०२२ पर्यंत चालू ठेवण्यास सोबत जोडलेल्या विवरण पत्रानुसार शासनाची मान्यता प्रदान करण्यात येत आहे. सदर मुदतवाढ संदर्भ क्र.१

व २ च्या शासन निर्णयान्वये निश्चित केलेला आकृत्तीबंधात या पदांचा समावेश आहे या अटीच्या अधीन राहून देण्यात येत आहे.

सदर पदांवर होणारा खर्च हा -मागणी क्र.सी-७, प्रधान शीर्ष २४१५ कृषी विषयक संशोधन व शिक्षण, ०६-वनीकरण, २७७ शिक्षण (००)(०२) कुंडल विकास प्रशासन व व्यवस्थापन प्रबोधिनी (वने) कुंडल, ३१-सहायक अनुदाने (वेतनेत्तर), ३६-सहायक अनुदाने (वेतन) (२४१५ १०६८) या लेखाशीर्षा खाली दर्शविण्यात यावा व त्या खालील सन २०२२-२३ या वित्तीय वर्षी उपलब्ध होणा-या अनुदानातून भागविण्यात यावा व अर्थसंकल्पीय तरतुदींच्या मर्यादेतच उपरोक्त पदांसाठी खर्च करावा. सदर कालावधी मध्ये त्यांच्या आस्थापनेवरील मंजूर पदांचा आढावा घेवून सुधारीत आकृतीबंधास उच्चस्तरीय सचिव समितीची मान्यता घेणे आवश्यक आहे. या नंतर सुधारीत आकृतीबंध निश्चीत करण्याकरीता कालावधी वाढवून देण्यात येणार नाही.

प्रस्तूत शासन निर्णय हा वित्त विभागाच्या शासन निर्णय, क्रमांक- पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दिनांक २२.०२.२०२२ अन्वये प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारास अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२२०३१६१८०९३८१५१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

GAJENDRA PRAKASH NARWANE

Digitally signed by GAJENDRA PRAKASH NARWANE
DN: CN = GAJENDRA PRAKASH NARWANE, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = REVENUE AND FOREST DEPARTMENT
Date: 2022.03.16 18:23:04 +05'30'

**( गजेंद्र नरवणे )**
**सह सचिव (वने)**
**महसूल व वन विभाग**

**प्रति,**

१. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
२. प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
३. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (संशोधन, शिक्षण व प्रशिक्षण ) महाराष्ट्र राज्य पुणे
४. मुख्य वनसंरक्षक (शिक्षण व प्रशिक्षण) महाराष्ट्र राज्य पुणे
५. मुख्य वनसंरक्षक (प्रा.) कोल्हापूर
६. मुख्य वनसंरक्षक तथा महासंचालक, कुंडल विकास, प्रशासन व व्यवस्थापन प्रबोधिनी (वने), मौजे कुंडल ता.पलूस, जि.सांगली
७. महालेखापाल-१/२ (लेखा व अनुज्ञेयता/ लेखा परीक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर.
८. जिल्हा कोषागार अधिकारी, कोल्हापूर/सांगली.
९. नियोजन विभाग (कार्यासन १४५४), मंत्रालय, मुंबई-४०००३२.
१०. वित्त विभाग, व्यय १०/अर्थसं-४/वित्तिय सुधारणा, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
११. कार्यासन अधिकारी (ब-१ कार्यासन), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
१२. निवडनस्ती, फ-९ कार्यासन,म. व व.वि,.मंत्रालय,मुंबई-३२.

**शासन निर्णय क्रमांक:- संकीर्ण-२०२२/प्र.क्र.५०/फ-९, दिनांक १६ मार्च, २०२२**

**सोबतचे विवरणपत्र**

**(दिनांक ०१.०३.२०२२ ते दिनांक ३१.०८.२०२२ पर्यंत मुदतवाढ देण्यात आलेली पदे)**

| अक्र. | पदाचे नांव | संख्या |
|---|---|---|
| १ | महासंचालक (मुख्य वनसंरक्षक) | १ |
| २ | संचालक (वनसंरक्षक) | १ |
| ३ | प्राध्यापक (व्यवस्थापन व प्रशासन) ( वनसंरक्षक) | १ |
| ४ | प्राध्यापक (समाजशास्त्र, राज्यशास्त्र व मानसशास्त्र ) | १ |
| ५ | अपर संचालक (प्रशिक्षण) (विभागीय वन अधिकारी) | १ |
| ६ | सहयोगी प्राध्यापक (अभियंता) | १ |
| ७ | सहयोगी प्राध्यापक ( संगणक) | १ |
| ८ | प्रशिक्षण कार्यक्रम समन्वयक (वनक्षेत्रपाल) | १ |
| ९ | कार्यालय अधिक्षक | १ |
| १० | लघुलेखक (निम्न श्रेणी) | १ |
| ११ | लेखापाल | १ |
| १२ | रोखपाल(लेखापाल) | १ |
| १३ | लिपिक | १ |
| १४ | दृकश्राव्य व्यवस्थापक | १ |
| १५ | क्रिडांगण सहायक | १ |
| | **एकूण:-** | **१५** |

GAJENDRA PRAKASH NARWANE

Digitally signed by GAJENDRA PRAKASH NARWANE
DN: CN = GAJENDRA PRAKASH NARWANE, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = REVENUE AND FOREST DEPARTMENT
Date: 2022.03.16 18:23:19 +05'30'

**( गजेंद्र नरवणे )**
**सह सचिव (वने)**
**महसूल व वन विभाग**

*****************